**शासकिय योजना व विकास कामे यांची माहिती देणारे माहितीपट तयार करण्यासाठी माहितीपट निर्माता यादीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१६/प्र.क्र.३४६/कार्या.३४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक - ०२ डिसेंबर, २०१६

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र. मावज-२०१३/प्र.क्र.४२३/३४ दि.२४ डिसेंबर,२०१३

२) संचालक (माहिती) (वृत्त), माहिती जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र. वृत्तचित्र-२०१६/निर्माता यादी-मुदत वाढ/का.७/४१७ दि.१४/१०/२०१६

**शासन निर्णय:-**

शासकिय योजना व विकास कामांना प्रसिध्दी देण्यासाठी शासनाच्या निरनिराळया विभागांना माहितीपट तयार करण्याकरिता शासनमान्य माहिती पट निर्मात्यांची निवड यादी माहिती जनसंपर्क महासंचालनालयामार्फत तयार करण्यात येते व यादीवरील निर्मात्यांमार्फत विविध विषयांच्या माहितीपटांची निर्मिती करण्यात येते. संदर्भाधीन अनु. क्र. १ च्या शासन निर्णयान्वये शासनमान्य खाजगी माहितीपट निर्मात्यांच्या यादीस दि.३१ ऑक्टोबर,२०१६ पर्यंत मान्यता देण्यात आलेली आहे. सदर मुदत संपुष्टात आली आहे.

२. शासन मान्य माहितीपट निर्मात्यांची नवीन यादी तयार करण्याची कार्यवाही सुरु असून त्यास काही अवधी लागण्याची शक्यता आहे. त्यामुळे दिनांक २४ डिसेंबर,२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या माहितीपट निर्मात्यांच्या यादीस दिनांक ३१ जानेवारी,२०१७ पर्यंत अथवा नवीन माहितीपट निर्मात्यांची यादी अस्तित्वात येईपर्यंत या पैकी जे अगोदर घडेल त्या दिनांकापर्यंत या शासन निर्णयान्वये मुदत वाढ देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०२१२३९२८७४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2016.12.02 12:45:09 +05'30'

**( रा. ना.मुसळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई ३२.
२. महालेखापाल, १/२(लखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
५. संचालक (प्रशासन) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय मुंबई
६. संचालक (वृत्त शाखा) (प्रकाशने), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई यांजकडे प्रसिध्दीसाठी.
७. संचालक (माध्यम( माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
८. उपसंचालक (माहिती) महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
९. सर्व उपसंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
११. निवड धारिका (का.३४)